शासन सेवेतील महिला कर्मचा-यांच्या समस्यांचा विचार करण्यासाठी शासनाने नेमलेल्या समितीच्या शिफारशींची अंमलबजावणी.

---

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: एसआरव्ही-१०८९/सीआर-३४/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० ऑगस्ट, १९८९.

वाचा :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-१०७२/डी, दिनांक १५ जुलै, १९७२.

शासन परिपत्रक :- शासन सेवेतील महिला कर्मचा-यांच्या समस्यांचा विचार करण्यासाठी शासनाने नेमलेल्या समितीच्या शिफारशींपैकी शिफारस क्रमांक २ संबंधात शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०७२/डी, दिनांक १५ जुलै, १९७२ च्या परिच्छेद [१] मध्ये, महिला कर्मचा-यांच्या गा-हाण्यांचा विचार करण्यासाठी चौकशी समिती नेमण्याबाबत जे आदेश देण्यात आले आहेत, त्यामध्ये समिती घटित करण्याबाबत असे आदेश आहेत की, प्रत्येक विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणी एक चौकशी समिती असावी. त्या समितीचे अध्यक्ष विभागीय आयुक्त असावेत. तसेच पिडित महिला कर्मचारी ज्या विभागातील असेल त्या विभागाचे विभाग प्रमुख व त्या महसूल विभागातील वरिष्ठ महिला अधिकारी त्या समितीचे सदस्य असावेत.

२. हे आदेश निर्गमित करण्यात आले त्यावेळी सामान्य प्रशासन विभागातील महिला कल्याण अधिका-याची कार्यकक्षा फक्त मुंबईतील कार्यालयापुरती मर्यादित होती. शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७२/२०२९/१६-अ, दिनांक ३१ ऑक्टोबर, १९७९ नुसार असे स्पष्ट करण्यात आले की, सामान्य प्रशासन विभागामधील महिला कल्याण अधिकारी, महिला कर्मचा-यांना त्यात येणा-या सुविधांची तपासणी करण्यासाठी अधूनमधून विभागीय मुख्यालयांना भेट देतील. सामान्य प्रशासन विभागामधील महिला कल्याण अधिकारी यांच्या कार्यकक्षेत करण्यात आलेली वाढ लक्षात घेऊन उपरोक्त दिनांक १५ जुलै, १९७२ च्या आदेशाच्या परिच्छेद [१] मधील आदेशात अंशत: बदल करण्यात येत आहे व आता असे आदेश देण्यात येत आहेत की, ज्याच्या विरुद्ध गा-हाणे असेल ती व्यक्ती जर राजपत्रित अधिकारी असेल तर जिल्ह्यांतील अशा सर्व प्रकरणांमध्ये चौकशी समितीवर संबंधित महसूल विभागातील [ Revenue Division ] वरिष्ठ महिला अधिका-यांऐवजी, सामान्य प्रशासन विभागातील महिला कल्याण अधिकारी यांची सदस्य म्हणून नेमणूक करण्यात यावी. तथापि ज्याच्या विरुद्ध गा-हाणे आहे ती व्यक्ती जर अराजपत्रित असेल त्या प्रकरणी मात्र पूर्वीप्रमाणे त्या महसूल विभागातील [ Revenue Division ] वरिष्ठ महिला अधिकारी यांची सदस्य म्हणून नेमणूक करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि. शा. हिरोजगनेर,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

कृ. प. उ.

शा. म. मु. रोटा/एच-८२१[४०००-९-८९]

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
प्रोथोनोटरी आणि सिनिअर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई [पत्राने],
प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई [पत्राने],
शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन क्रमांक ११,
महिला कल्याण अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.

-----------

म्प-८२१[४०००-२-८६]-अ